**अतिरिक्त सरकारी अभियोक्ता,गट-अ संवर्गातील अभियोक्त्यांना सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, गट-अ या पदावर पदोन्नती देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक : डीपीपी-२०१०/११८५/प्र.क्र.२५८/पोल-१०**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२, दिनांक : २७ जून, २०११**

**वाचा** : संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्रमांक/ असपदो/१०८/२३९/ २०११, दिनांक ३.०२.२०११ चे पत्र.

**<u>आदेश</u>**

संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील अतिरिक्त सरकारी अभियोक्ता, गट-अ या संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिका-यांना त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या ठिकाणी सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, गट-अ या संवर्गातील रु.१५६००-३९१०० ग्रेड पे रु.६९००/- या वेतनश्रेणीतील पदावर प्रशासकीय हितास्तव व तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने नियुक्त्या देण्यात येत आहेत.

| अ. क्र. | अभियोक्त्याचे नांव | सध्या कार्यरत असलेले ठिकाण | मान्य झालेला विभागीय सवंर्ग | पदोन्नतीनंतरचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.शिवाजी प्रल्हादराव चव्हाण | लातूर | औरंगाबाद | उस्मानाबाद |

२. वरील अधिका-यांना देण्यात आलेली पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) वरील अधिका-यांना देण्यात आलेली पदोन्नती ही तात्पुरत्या स्वरुपाची असून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

ब) पदोन्नत झालेल्या अधिका-यांनी त्यांच्या पदोन्नतीचे आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून सात दिवसांच्या आत हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहित मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत तर त्यांना पदोन्नती नको, असे समजून शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०८७/११३१/प्र.क्र.११/८९/१२, दिनांक ३०.०४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांना देण्यात आलेली पदोन्नती रद्द करण्यात येईल.

क) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी पदोन्नत झालेल्या वरील अधिका-यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधीतांना सूचना द्याव्यात. तसेच संबंधीत कर्मचा-यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

ड) पदोन्नत अधिका-यांनी त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे व त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये, यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर -१०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.०८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नवीन नियुक्ती रद्द करण्यासाठी कोणत्याही स्वरुपाचे आवेदन त्यांनी करु नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगाच्या कार्यवाहीस पात्र ठरतील, याची संबंधीतांनी नोंद घ्यावी.

ई) सदर पदोन्नती तात्पुरत्या मा.उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४ च्या निर्णयाच्या अधीन राहतील.

३. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०६२७१७३७४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि.वि.दपके )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
३) सामान्य प्रशासन विभाग,(कार्यासन-१२), मंत्रालय,मुंबई-३२
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
५) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई
६) मा. ंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
७) प्रधान सचिव (अ.व सु.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, औरंगाबाद
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
११) श्री.शिवाजी प्रल्हादराव चव्हाण, अतिरिक्त सरकारी अभियोक्ता (संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या मार्फत )
१२) निवड नस्ती (पोल-१०)